

: संपर्क :
ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे - ४००६०४
९८६९६७४८२०

हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी
तसेच सूचना, अभिप्राय
व प्रतिक्रियांसाठी
netaksharee@gmail.com

# !!!!! घुंगराच्या बोलावर !!!!!

**"लावणी"**, महाराष्ट्राच्या सधन लोककलेतील एक अंत्यंत बहारदार कलाप्रकार, लावणी च मुळ लावण्यात, श्रुंगारात. ढोलकी , तबला, हार्मोनियम सोबतीला तुनतुनं यांनी एकत्रीत साद घातली की घुंगरानाही मग रहावत नाही, चाळ बांधलेले पाय आपोआप थिरकायला लागतात आणि कोणी एक लावण्यवती तिझ 'काल रातीच' गुपित ,त्याचा खटयाळ पणा हळु हळु अत्यंत मादक शब्दातुन आणी नृत्यातुन उलगडत जाते. एकंदरीत पारंपारीक लावणीचा मुळ बाज हा असा.

लावणीचा उगम तसा पंधराव्या शतकातला पण तिला कलेचा दर्जा मिळाला तो पेशव्यांच्या काळात आणि पुढे तिला जनसामान्यांत आणलं ते राम जोशी, अनंत फंदी, होनाजी बाळा, प्रभाकर , पठ्ठे बापुराव यांनी. या सर्वांनी तीला वाढवली, तिच संगोपन केल.

लावणी चे मुख्यतः दोन प्रकार , नीर्गुनी लावणी आणी श्रुंगारीक लावणी. होनाजी बाळा यांनी पुढे यात 'बैठकीची लावणी' हा नविन प्रकार या कलेत सामाविष्ट केला.

लावणी हिं नुसतीच मनोरंजनाची कला न रहात अनेकदा यातुन समाज प्रबोधन ही केल जात. खरतर लावणी ही कला अजुनही जोपासली जातेय ती गावोगावाच्या जत्रेत, तमाशांच्या फडात . आजही गावोगावी जत्रा भरल्या की तमाशा चे फड बोलवले जातात , परंपरेप्रमाणे गण, गवळण झाल्या नंतर फर्माइश असते ती फक्कड लावणीची , काळजात हात घालणाऱ्या एखाद्या लावणीवर फ़ेटे उडवले जातात, जल्लोष होतो, दौलत ज्यादा केली जाते.

लावणीचं मराठी चित्रपट सृष्टीतलं योगदान वाखणण्याजोग आहे, साठ सत्तर च्या दशकातले बरेच सिनेमे हे तमाशा आणि लावणी या कला प्रकारालाच वाहिलेले होते. चित्रपट आणि लावणी यांच ते नात आजतगायत कायम आहे आणि पुढेही असेल यात शंका नाही.

या अंकात आम्ही तुमच्या साठी घेऊन आलो आहोत आपल्यातीलच नवकवींच्या काही लावण्या, तत्सम काही कविता . नेटाक्षरीवर प्रेम करणाऱ्या सर्व रसिक वाचकांचे मनापासुन आभार !

**शशिकांत रणवरे**

**ठाणे**

यजमान संपादक



# !! --- चाळ घुंगरांचा --- !!

पायात बांधला मी
हा चाळ घुंगरांचा
एकेक नाद त्याचा
करी कैक जीव वेडा

मैफिलीत सूर माझे
कधी ऐकले कुणी का?
भुवयीत उंच माझ्या
ते शोधती तराणा

हर एक अदा माझी
उधळती कैक नोटा
त्यांच्याच इभ्रतीचा
झाला रिता खजिना

..ठेवितो चोख जपुनी
"तो" हिशोब तुझा माझा
रात्रीस भोगतो मज
दिवसा राउळी उताणा

मी सोडली लाज ही
परी "स्वत्व" सोडले ना
शरीरास मारुनी ह्या
आत्म्यास प्राण दिधला
....... पायात बांधला मी
....... हा चाळ घुंगरांचा

-------------------------

भारती सरमळकर

# !! --- एकून घ्या मागणी --- !!

नार देखणी, जणू मोरनी, थिरके हिरव्या रानी
नजर कट्यारी, टंच उभारी, मुसमुसलेली ज्वानी
अहो राजसा, जवळी बसा, एकून घ्या मागणी
माझी एकून घ्या मागणी

मान वळविते, जरा झटकते, डौल हंसापरी
असा शिणगार, नव रत्नहार, गोऱ्या कांतीवरी
विशाल भाळी, आणा बिंदली, लखलख चंद्रावाणी
माझी एकून घ्या मागणी

गर्भ रेशमी, रंग कांचनी, शालू हा भरजरी
मखमल चोळी, निळी जांभळी, नक्षी काठावरी
कमर साजिरी, बंद चंदेरी, घाला मज आणुनी
माझी एकून घ्या मागणी

धुंद गारवा, मनी काजवा, लुकलुक करतो भारी
विडा केशरी, रंगतो परी, मैफिली सजते न्यारी
बसा पळभरी, देह कस्तुरी, लुटेल दुजा कुणी
माझी  एकून घ्या मागणी.



------------------------

प्राजक्ता पटवर्धन



# !! --- नाशिकची अंगूरी --- !!

वेलीला सोसना भारं
दिला खाम्बाचा आधारं
गळल मनी झाले बेजार
लै नाजूक हा कारभार
धड-धड व्हतया उरी
मी नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी

रंग माझा देखना हरा, देखना हरा
चव जिभेवर ठिवतोय खरा, ठिवतोय खरा
माझ्या रूपाची जादूगरी
मी नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी
ही नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी....

माला थंडीच वाटतय भ्याव, वाटतय भ्याव
घालू नगा तुम्ही हो घाव, अहो घाव
करू नगा अशी शिरजोरी
मी नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी
ही नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी....

टिकट न्हाई मी हो लंबट, मी हो लंबट
डोळ मराल व्हईल आंबट, व्हईल आंबट
माला बिगी-बिगी न्या हो घरी
मी नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी
ही नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी....

माझ्या रसाची किमया न्यारी, किमया न्यारी
झिंगत येते बाई- बाई स्वारी, बाईग स्वारी
नगा फिरू आता माघारी
मी नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी
ही नाशिकची नाशिकची नाशिकची अंगूरी....

-------------------------

**पीयूष नाशिककर**

# !!--- इच्छा ---!!

आम्ही सरदार प्रांतीचे , आलो पेशव्यांचे चरणी
मूर्त लहान, परि पाहीली, जबरदस्त नानांची करणी

बेत राहिला मनातच मनीचा, होळकरांची शब्दे सारी
फजित केले नानाने, चाललो परत आपुल्या घरी

इच्छा दर्शवली पंतांजवळी, व्हावा आज संग केतकीशी
कानी भरून घ्यावे, मधूर स्वर धुंद होऊन तुजपाशी

म्हणूनि सखे चोखाळला इथला विस्तृत हा राजमार्ग
पंतानी दाखविला अन आलो, पाहण्या तव द्वारीचा मार्ग !

गा गावून दाखव , सुंदरसे कवन , दाव नाचूनि आम्हा
अहा ! किती गोड तुझा मुखडा, मेनकाच भासे आम्हा

उंच मूर्ती, टंच स्थाने, केवडी काया, काळी झुलपे
नाजूक हात, कसबी खरे, लोळवशील किती गं रूपे

ओष्ठ द्वयांचे चुंबन घ्यावे , वाटे कवेत कवळावी
सखे तुझ्या संगतीत, रात्र सारी जागवावी

कर तृप्ती अमुची इत्कुशी तू अप्सरा बावन खणीची
मोड घडी पैठणीचीह्या, होऊं दे इच्छा पुरी मनीची !

-------------------------

सुरेश पेठे





# !!--- तुझ्याविना राया ---!!

धुंद केवड्याचा रंग, हिचं सोनसळी अंग
जणु मदनाचा संग, गाठ कपड्याची तंग
आज रंगात हो भंग, राया अजून ना आला,
पोर मनात हुरहुरली !!

राजबिंड्यावर जीव, जडलाय भारी,
मन निवांत ना राही, ज्वानीची खुमारी
परतून देण्यासाठी श्वासाची उधारी,
ओठ आवळून बंद, गळी दाबलेला स्पंद,
नथ नाकात थरथरली ॥१॥

सवयीनं तुझ्या राया, ओढ वाढलेली
सांजवात होताहोता, सजून बसली
चाहुलीचा भ्रम होतो, मनी आसुसली
रात अर्ध्यावर गेली, उरी घालमेल झाली,
मन पाकोळी फडफडली ॥२॥

काहो दुष्टपणा असा, दूर कशी केली
अजुन का माझी तुम्हा, सय नाही आली
वाट किती पाहू आता, पापणी थकली
तुझ्याविना राया आता, श्वास वरखाली होता,
कळ उरात शिरशिरली ॥३॥

------------------------

कुमार मोकाशी

# !!--- दाजीबा जाऊ नका ---!!

औंदा गाठलंय वरिस सोळाऽऽऽऽ
औंदा गाठलंय वरिस सोळा
अंगा-अंगात ज्वानीच्या ज्वाळा
रोखून मजला पाहू नका...
न् चालला कुटं दाजीबा जाऊ नकाऽ

(हिला सोडून दाजीबा जाऊ नकाऽऽऽऽऽऽ)

बेभान जवानी मदनाची.....
व्हनार रानी मी राज्याची......
अवो फुकाचा इंगा दाऊ नका....
चालला कुटं दाजीबा जाऊ नकाऽऽऽऽऽ

(हिला सोडून दाजीबा जाऊ नकाऽऽऽऽ )

दाताखाली व्हाट अन मिटून डोळा......
करतोय चावट खानाखुना.......
हाताला हात तुमी लाऊ नका.....
चालला कुटं दाजीबा जाऊ नकाऽऽऽऽ
(अवो दाजीबा जाऊ नकाऽऽऽऽ
दाजीबा जाऊ नकाऽऽऽऽ )

------------------------

गीतरुप





## !!--- सिग्नल ( लावणी ) ---!!

बघा सिग्नल लागलाय हिरवा.........
पावनं.... खुश्शाल चावी फिरवा,
पुलावरून जायचं की, खालून...कसं ते
तुम्हीच तुमचं ठरवा !
पावनं......सिग्नल लागलाय हिरवा.........

चला गीय्यर वेगळा टाका......
अन हळूच्च वाजवा हॉर्न,
पुढं ट्रेफिक दिसतोय जादा......
तर गुमानं घ्या यु-टर्न
भिजून घामानं,.... झाले मी हैराण
अंग-अंगात घुमतोय पारवा
पुलावरून जायचं की खालून...कसं ते
तुम्हीच तुमचं ठरवा !

इकडं तिकडं भटकू नका......
उग्गाच इंधन वाया जाईल ,
गल्ली मध्ये नो एन्ट्रीच्या......
अडकून पडायला होईल
सुसाट वेगात,.... येऊन रंगात
हौस मौजेची माझी पुरवा
पुलावरून जायचं की खालून...कसं ते
तुम्हीच तुमचं ठरवा !

-------------------------

मंदार चोळकर

# !!--- वाजले कि ---!!!

चैत्र पुनवेची रात आज आलीया भरात
धड धड काळजात माझ्या मायेना
कधी कवा कुठ कस जीव झाल येड पीस
त्याचा नाही भरवस तोल राहीना.....

राखिली कि मर्जी तुमच्या जोडीन मी आले
पिरतीच्या या रंगी राया चिंब ओली मी झाले
राया सोडा आता तरी काळ येळ नाही बरी
पुन्हा भेटू केंव्हातरी साजणा ...

मला जाऊ द्या ना घरी
आता वाजले कि बारा ...

हे कशापायी छळता माग माग फिरता
अस काय करता दाजी हिला भेटा कि येत्या बाजारी
हे सहाची बी गाडी गेली नवाची बी गेली
आता बाराची गाडी निघाली
मला जाऊ द्या ना घरी
आता वाजले कि बारा ... // धृ //

ऐन्यावानी रूप माझ उभी ज्वानीच्या मी उंबर्यात
नादवल खुळपिस कबुतरही माझ्या उरात
भवताली भय घाली रात मोकाट हि चांदण्याची...
उगा घाई कशापायी हाये नजर उभ्या गावाची ...
नारी ग राणी ग हाये नजर उभ्या गावाची...

हे शेत आल राखणीला झाल राघु गोळा
शीळ घाली कुठून कोणी करून तिरपा डोळा
आता कस किती झाकू सांगा कुठवर राखू
राया भान माझ मला राहीना....



*आल पाड झाला भार भरली उभारी घाटाघाटात*
*तंग चोळी अंग जाळी टच्च डाळिंब फुट व्हटात*
*गार वार झोंबणार द्वाड पदर जागी ठरना*
*आडोशाच्या खोडीचं मी कस गुपित राखू कळना*

*हे .. नारी ग रानी ग कस गुपित राखू कळना*

*मोरावानी डौल माझा मैनेवानी तोरा*
*औन्धाच्या बा वर्सला मी गाठल वय सोळा*
*जीवा लागलीया गोडी तरी कळ काढा थोडी*
*घडी आताची हि तुम्ही राहू द्या ...*

-------------------------

**चित्रपट : नटरंग**

**गीत : गुरु ठाकूर**

**संगीत : अजय - अतुल**

**गायिका : बेला शेंडे**



# सुंदरा मनामध्ये भरली......!!!!

सुंदरा मनामध्ये भरली जरा नाही ठरली
हवेलीत शिरली मोत्याचा भांग ...(२)
अरे गड्या हौस नाही पुरली
म्हणुनी फिरली पुन्हा नाही फिरली
कुणाची सांग ...(२)
नारी ग जी ... // धृ //

जशी कळी ...(२) सोन्या चाफ्याची
न पडू पाप्याची दृष्टी सोप्याची
नसेल ती नार ...(२)
अति नाजूक तनु देखणी ...(२)
गुणाची खणी उभी नवखणी
चढून सुकुमार ...(२)
नारी ग जी ... // १ //

नाकामध्ये पुलाख सुरती ...(२)
चांदणी वरती चमकती परी तिच्यापुढे फार
तिन्काप अंगीचा लाल
हीच पुढे नको तलवार
कवीराज चमकतो हिर ...(२) लोकशाहीर
इतर शाहीर काजवा माग ...(२)
नारी ग जी ... // २ //

चित्रपट : लोकशाहीर राम जोशी
गीत : शाहीर राम जोशी
संगीत : वसंत देसाई
गायक : जयराम शिलेदार





# !!--- आधी आना की पैठनी ---!!

(ढोलकी वाजते...... बाई लाजत मुरडत ठुमकत येवून थांबते.)
शेवंता : ( ब्याकस्टेज ला कोणाकडे तरी बघत म्हणते).....

जावा की तिकडं
बबन्या : आत्ता गं बया....ये शेवंता काय गं बाई...‼...
काय लाजतीस, काय मुरडतीस
शेवंता : (पुन्हा मागे बघत म्हणते).....आम्ही न्हाई जा.....
बबन्या : आत्ता काय म्हनावं हिला....‼

तुनतुनं सुरु होतं आणि ढोलकी वाजू लागते.
(हार्मोनिअम सुरु)......

लाडात येऊनी मिठीत घेऊनी
अंव्दा कराकी तुमची रानी
आधी आना की पैठनी, मला आना की पैठनी

कोरस : हे....बिगीबिगी जाऊनी दुकानात पाहूनी.....
बघा रुसुन बसलीया रानी
पावनं आना की पैठनी, हिला आना की पैठनी
(हार्मोनिअम......)

काठ हवा तिला भरजरी
मोर नाचरा पदरावरी
होत्याल घायाळ बघुनी सारी
म्हनत्याल दिसत्येया लय भारी

नजरा रोखूनी गजरा माळूनी
अंव्दा कराकी तुमची रानी
आधी आना की पैठनी, मला आना की पैठनी

कोरस : हे....बिगीबिगी जाऊनी दुकानात पाहूनी.....
बघा रुसुन बसलीया रानी
पावनं आना की पैठनी, हिला आना की पैठनी
(हार्मोनिअम......)



रंग हवा हिरवागार
ज्वानीचा सोसल त्यो भार
नजरेस तुमच्या लई धार
काळजात माझ्या आरपार

जवळ घेऊनी मुकाबी देऊनी
अंव्दा कराकी तुमची रानी
आधी आना की पैठनी, मला आना की पैठनी

कोरस : हे....बिगीबिगी जाऊनी दुकानात पाहूनी.....
बघा रुसुन बसलीया रानी
पावनं आना की पैठनी, हिला आना की पैठनी
(हार्मोनिअम......)

नेसुनी काष्ठी नऊवारी
गळ्यात साज कोल्हापुरी
तुम्हास बाई लय घाई
जराबी धीर धरवत न्हाई

डोरलं देऊनी दर्शन घेऊनी
अंव्दा कराकी तुमची रानी
आधी आना की पैठनी, मला आना की पैठनी

कोरस : हे....बिगीबिगी जाऊनी दुकानात पाहूनी.....
बघा रुसुन बसलीया रानी
पावनं आना की पैठनी, हिला आना की पैठनी
(हार्मोनिअम......)

लाडात येऊनी मिठीत घेऊनी
अंव्दा कराकी तुमची रानी
आधी आना की पैठनी, मला आना की पैठनी

कोरस : हे....बिगीबिगी जाऊनी दुकानात पाहूनी.....
बघा रुसुन बसलीया रानी
पावनं आना की पैठनी, हिला आना की पैठनी
(हार्मोनिअम......)

------------------------

अमरीश अ. भिलारे

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे. दर वेळी येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतोच. याच प्रोत्साहनाच्या बळावर आपण शतक गाठले आणि पुढला प्रवास अधिक जोशाने होत जाईल यात काही शंकाच नाही. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८५००० मराठी रसिकांना विनामुल्य वितरित केला जातो. या व्यतिरिक्त जुने अंक पहाण्यासाठी **www.esahity.com** या वेबसाईट वर व्हिजीट करणाऱ्यांची संख्या ही लक्षणीय आहे.हे अंक आपण ईष्ट मित्रांना फॉरवर्ड करुन त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे.त्याच मेलची **CC** आम्हाला **netaksharee@gmail.com** दिल्यास आम्ही पुढचे अंक त्यांनां विनामुल्य पाठवत राहु. मराठीची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यात आपलाही हातभार लागावा असे कोणाला नाही वाटणार? आपल्यासारख्याच रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचा पल्ला पार करील हा विश्वास आहे.

### : ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर प्रकाशने :

विनोदाचा दादा - ई-स्टाप, कवितांचा आवाज - स्वरनेटाक्षरी अल्बम,
मुलांचा नेट प्रवेश - बाल नेटाक्षरी, महाराष्ट्राच वैभव – दुर्ग दुर्गट भारी

### : प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके :

टल्लीची शाळा, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, मकरंदच्या त्रिवेण्या, मीरा (मराठी अनुवाद),
सावळ्या मुलीची गाणी, देशी दारुचे दुकान(3D), ओथंब, ओथंब२, मोरया, सईची वही,
लोकल गोष्टी, प्रियेचे अभंग, तो आणि ती, अहम् ब्रम्हास्मि,
मराठी कसे लिहावे(ई-शाळा), तो, ती आणि सिगरेट, एक होते राजे, आरंभ

वरील सर्व ई-पुस्तके विनामुल्य मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता
संपर्क : **esahity@gmail.com**

नेटाक्षरीचे अंक नियमीत मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता
संपर्क : **netaksharee@gmail.com**

ई-साहित्य प्रतिष्ठानची आजवरची १३६ ई-प्रकाशने सीडीवर उपलब्ध
शतकोत्सव ५० रुपयात १३६ पुस्तके
संपर्क : 9869674820

**www.esahity.com**